**आदिम तालनं संगीत**
सुधीर देवरे

प्रथम आवृत्ती
जुलै २०००

मूल्य रु. ८०

© सुधीर देवरे
टेलिफोन कॉलनी, बसस्थानकाच्या मागे
सटाणा-४२३ ३०१ जि. नाशिक.
महाराष्ट- राज्य

मुखपृष्ठ रेखाचित्र
हरि मानसिंह राठवा

प्रकाशक
भाषा संशोधन प्रकाशन केंद्र
६, युनायटेड ॲव्हेन्यू
दिनेश मिलजवळ, बडोदा-७
गुजरात

मुद्रक
एम. एस. युनिव्हर्सिटी प्रिन्टिंग प्रेस
राजमहाल रोड, बडोदा-१

अहिराणी भाशिक नहीत तरीबी

अहिराणीले जीव लावनारा

डॉ. गणेश देवी यास्ले-

# दुःखाच्या पदरांवर

१९९७ च्या ऑक्टोबर महिन्यात छोटा उदेपूरला भाषा केंद्राचा एक परिसंवाद होता. त्यात भारतातली बरीच विद्वान मंडळी जमली होती. त्या साऱ्या गडबडीत माझे लक्ष एका लाजऱ्याबुजऱ्या तरुणाने वेधून घेतले. जवळजवळ कोणत्याच प्रकारचा संवाद न साधता हा तरुण आपल्या गावाला परत गेला. नंतर ५-६ महिन्यांनी बंगालच्या मिदनापूर युनिव्हर्सिटीत एक परिसंवाद योजला होता. त्याची जबाबदारी काही प्रमाणात माझ्यावर होती. महाराष्ट्र--गुजरात मधून जाणाऱ्या सहकाऱ्यांत मी या तरुणाची निवड करायचे ठरवले.

नाव सुधीर देवरे, त्या वेळेस Ph.D. चा प्रबंध विद्यापीठात सादर केला होता. व्यवसाय सटाण्याच्या टेलिफोन एक्स्चेंजमध्ये नोकरी. मुंबई-कलकत्ता प्रवासात याचा एक नवा गुण ध्यानात आला - हे कविताही लिहितात. मला वाटले, इतर सर्व तरुणांप्रमाणे बेताच्या कविता असाव्यात. मी थोडे दुर्लक्ष केले.

नंतर त्यांचा Ph.D. संपण्याचा फोन आला. एकदोन पत्रे आली. काही काळाने आमच्या ढोल नियतकालिकाची माहिती मी त्यांना कळवली. त्यांनी प्रत्यक्ष अहिराणी भाषेत ढोल चालवण्याची इच्छा व्यक्त केली. आणि नंतर थोड्या दिवसातच त्यांनी अत्यंत सुबक, दृष्ट लागण्यासारखा अंकही प्रकटवला.

मला वाटले एका अंकानंतर थकतील. तर त्यांचा उत्साह वाढत चाललेला. मराठी वर्तमानपत्रांतही त्यांच्या कामगिरीचा बराच बोलबाला झाला.

काही कारणाने मी सटाण्याला जायचे ठरवले. तेथल्या जवळपासच्या खेड्यांत मला डॉ. देवरे घेवून गेले. तेथल्या ग्रामीण विस्तारात त्यांच्याबद्दलचे प्रेम व आदर पाहून मी विस्मित झालो. भारावून परत निघालो तेव्हा देवरे म्हणाले, 'सर कवितांचे काय ?' मी उडवाउडवीचे उत्तर दिले. पण बडोद्याला परतल्यावर कविता वाचायला घेतल्या. अहिराणीत, इतक्या सहज, मनाला नकळत चटका लावून जाणाऱ्या, प्रामाणिक कविता वाचताना त्या इतके दिवस प्रसिद्ध न केल्याची रुखरुख वाटत राहिली. याच सुमारास भाषा प्रकाशनाची कल्पना पुढे आली होती. त्यात मी आग्रहाने या कविता प्रसिद्ध

करण्याची योजना मांडली. त्याला संमती मिळाली.

या पुस्तकाचे मुखपृष्ठ खास एका आदिवासी तरुणाकडून बनवून घेतले. कारण सुधीर देवरे ज्या सांस्कृतिक वास्तवाचे किनारे शोधू पाहतात, त्यात परंपरेच्या गुंतागुंतीत स्थित झालेल्या समाजाची फार सखोल समजूत आहे.

अहिराणीचा इतिहास लिहिला जाईल त्यात डॉ. सुधीर देवरेंनी दोन महत्त्वाची पाने तर कमावली आहेतच. यांची प्रतिभा पुढेही झळकावी. त्यात ज्या दुःखाच्या पदरांवर भेदक प्रकाश टाकला आहे, त्याचा पार लागावा.

गणेश देवी<br>
बडोदा.

# कवीना दोन शब्द

ह्या 'आदिम तालनं संगीत' कवितासंगूह मझारल्या मन्ह्या कविता, १९८२ पशी ते आतापावतन्या लिहेल अहिराणी कवितास्मझारल्या निवडक कविता शेतीस. पैकी काही मन्ह्याच मराठी कवितास्ना मीच करेल अहिराणी अनुवाद-आशाबी जराश्या कविता यामा शेत. आशा सगळ्या यकून १५३ कविता ह्या संगूहमा समाविष्ट शेतीस. ह्या कविता कालकूमनुसार छापेल नहीत.

ह्या कविता पुस्तकसरूपात प्रकाशित व्हतीनच, यानी शाश्वती माले कैन्हच वाटनी नव्हती. पन १९९७ ले डॉ. गणेश देवी यास्नाशी परिचय जया. 'भाषा केंद्र' ना माध्यममझारतून 'ढोल' नियतकालिक सुरु जयं. त्यापैकी अहिराणी 'ढोल' नं संपादन मन्हाकडे वनं. यकदाव बडोदाले आम्ही 'ढोल' वर चर्चा करी ऱ्हायनू व्हतूत, त्यामा मन्ह्या अहिराणी कवितास्ना उल्लेख वना. येक वही मन्हासांगे व्हतीच. ती मी डॉ. देवी यास्ले दिधी. दुसरी वही सटाणाले व्हती. ती वहीबी पुढला येळे घी या, आशे त्यास्नी सांगं. बडोदानी नंतरनी भेटमा तीबी वही डॉ. गणेश देवी यास्नाकडे दिधी. मंग दोन्ही वह्या सावकाश वाचीसन हाऊ कवितासंगूह काढाना त्यास्नी निर्नय घिदा.

तशे पाह्य ते 'भाशा संशोधन केंद्र' नी आदिवासीस्ना कामले- आदिवासीस्ना वाङ्मयले आदूगर प्राधान्य देवानं ठरायेल शे. 'ढोल' मझारतूनबी त्याना प्रत्यय येसस. तरीबी थोड्याश्या आधुनिक कलावादी वाटतीन आशा मन्ह्या कविता राहिसनबी डॉ. देवी यास्नी कवितासंगूह काढानं ठरायं यानं माले खूप नवल वाटनं.

डॉ. गणेश देवी ह्या स्वतः अहिराणी भाशिक नहीत. पन परत्येक बोलीभाशावर त्यास्न खूप प्रेम शे. तशे अहिराणीवरबी शे. आनि ह्या प्रेममुळेच कवितासंगूह काढाना त्यास्नी निर्नय घिदा व्हयी. अहिराणी भाशाबद्दल वाटनारं प्रेम आनि मन्हावरलं प्रेम ह्या दोन्ही गोष्टी ह्या निर्नयमांघे व्हतीन.

डॉ. गणेश देवी भाशा केंद्रना काममा, आदिवासीस्न्या समस्यास्मा आनि आदिवासी अकादमी उभी कराना काममा सध्या खूप व्यस्त शेत. वाङ्मयसाई प्रत्यक्ष कामनी कृतीवर आज त्या जास्त भर देतंस. तरीबी ह्या सगळा पसारामातून येळातयेळ

काढीसन त्यास्नी ह्या संगूहले आपली प्रस्तावनाबी लिही. ह्या सगळ्या घटनास्मुळे मी भाराई गऊ. ते सगळं आठे कशे काय लिहू, हाऊच खरा प्रश्न पडेल शे.

ह्या सगळाच प्रकारनी मदतमुळे, त्यास्ना 'आभार' माननं खूपच वरवरला उपचार आनि इनोदबी ठरई. म्हनून आठे 'आभार' हाऊ शब्द मी मुद्दाम वापरनार नही. मी त्यास्ना कायम 'ऋणा' तच ऱ्हावानं ठरायेल शे.

ह्या सुट्या सुट्या लिहेल कवितास्ले पुस्तकनं नेटकं सरूप देवाकर्ता अरुणा जोशी, नीरज आनि भाशा केंद्रना सगळाच सुसभावी मानसस्नी हातभार लायात. ह्या सगळास्ना मनपशी आभार.

डॉ. सुधीर देवरे
बसस्थानकामागे, सटाणा-४२३ ३०१ (बागलाण)
जि. नाशिक (महाराष्ट्र)
दूरध्वनी ०२५५५-२१३५७

# अनुक्रमणिका

## मी कविताजवळ जास...

शुद्ध भाशा बोलनारा
मना मित्र येस
आणि माले
शुद्ध भाशा शिकाडाना
प्रयत्न करस...

तो वना का
मी त्यानासंगे शुद्ध भाशा
बोलानी कोशीश करस...

शुद्ध भाशानी धुंदीमा
मित्र जीवनले सहज इसरी जास...
तो उठी गया का मंग मी
भाशा फेकी देस
आनि कविताजवळ जास...

## झाडंबी वारा गिळीसन

आभाळात इतला
गोळा व्हयेल ढग
कुठे बुडी गयात
न गळताच !...
आनि झाडंबी
वारा गिळीसन
गुचचूप बसनात
जशा काही आजारीच !...

## आभाळवर उपकार...

कालदीस-परोंदीस
उगेल गाजर गवतबी
हिरवंगार !...

-जशा काही
आभाळवरच उपकार !...

## वरनावर ढगस्नी

ढग चढी येतंस वर
हेट्यातीन काळाभोर
कमी दाबना पट्टा
कुठे तयार जया
काय माहीत...
वीज चमकत नही
आभाळ गरजत नही
वाराबी सुटत नही
म्हनून पाऊसबी
तुटत नही
ढग अशीसन...
-फक्त वरनावर
ढगस्नी
सूर्य आडायी ठिया...

## नागोबाले यक नळा

नागोबाले
यक नळा पुरत नही...
नागोबा उठस
नळामा घुशीसन
लपत छपत
दूध वकस...
(नागोबा दूध पेत नही)
आनि नळातून बागे बागे
मान काढीसन
गाढ झोपी जास...
नागोबा परत उठस
नळात घुसस...
वकस...
आनि परत
नागोबा...

## म्हसनवटीच स्वर्गनं दार...

...मना मित्रनं आशे म्हननं व्हतं
त्याना गाववरन्या
मन्ह्या कवितास्मा
मोहस्ना झाडस्नासारखी
हिरवागार डोंगरस्नासारखी
निसटाळ्या पांदीस्नासारखी
धगधगती भूतजागी
म्हसनवटी
काबरं नही येत !...

-अशा येळे
भयान म्हसनवटीबी
स्वर्गनं दारच व्हस !
आनि म्हनशी ते
मन्ही कविताच शे आख्खी
म्हसनजोगी !...

## आता कोनती गोळी घेऊ ?

आभाळ
काळंकुट्ट भरी येस
गरजंस
आनि पाऊसबी
कोसळस
झडीनागत छळनदार...
तरीबी
आभाळ निखरत नही
ऊन पडत नही
आनि रातले
चांदनंबी...
...आता
कोनती गोळी घेऊ ?

## चिखोल अशा कशा

भगभगीत याळ
आनि सूर्य कुठे शे !
सूर्य आनि आपलामा
कोनी धरा
हाऊ आंतरपाट
आभुटना...

रातना काळोखात
पडनारा पानी
फुलसना
का वीर्यना...

-हाऊ चिखोल
अशा कशा
जाग वनी ते
अंथरूनातच !...

## खडळत ऱ्हास मनात...

मी नुसता
बशी ऱ्हास घरात...
माले चावता चावता
सापडना ते यखादा
डासबी मारी टाकंस...
मी काहीच करत नही नवं...
सगळं जुनंच
खडळत ऱ्हास
मनात...

## कसाना चटका बसतंस...

सगळीकडे
फटाकडा फुटतंस...
खुशीना...
माले कसाना इतला
चटका बसतंस !...

## उलटायं तरी पान तेच...

कोनं पत्र नही
कोनी वनं नही..
काही इशेश नही...
थोडं वाचं...
वाचता वाचता
किती मच्छर मारात !
यक कविता
येतायेताच
आर्धी निसटी गयी...
थोडं इकडनं तिकडे
आनि कॅलेंडरवर बदलेल तारीख
बाकी उलटायं तरी पान तेच
ऱ्हास कधळबी...

## माले भाशा जमत नही...

तुनाबरोबर बोलाले
मी डोळास्नी भाशा वापरी पाही...
खानाखुना करी पाह्यात...
मन्ही बोली-अहिराणी वापरी पाही...
पिजिन वापरी पाही
क्रिऑल वापरी पाही
तू तुनी 'प्रमाणभाषा' वरच आडेल
आदिम...
माले भाशा जमत नही
का तुले संवाद
माले माहीत नही !...

## दोन पावलस्ना विभ्रमात

ती अभिमुख उभी ऱ्हास
अधोमुख उभी ऱ्हास
अधुमुख उभी ऱ्हास...

ती दोन पावलं बदलंस
दोन पावलं पुढे जास
दोन पावलं मांगे जास...

ती दोन पावलंस्ना विभ्रमात
पोटात
सात पावलंबी
घट्ट रूताडी ठेवंस...

## कोरं करकरीत आभाळ...

दोन्हीसना मझार
कोरं करकरीत आभाळं उभं...
वारा नही
ढग नही
म्हनून
पाऊसबी नही
सगळं गडीचूप...
दोन्हीसना मझार फक्त
कोरं करकरीत आभाळ
निळं !...

## बरोबर नक्की...

यकदाव हायी बरोबर वाटस
यकदाव ते बरोबर वाटस
मंग बरोबर नक्की
काय ऱ्हास
तेच समजत नही !

## कोंडकात नीट बसत नही...

दार
सहज
लायी घेता येस,
यकदाव
निखळी पडनी ना कडी...
कोंडकात
नीट
बसतंच नही !

## उडीच जात व्हयी !

लोक दिवाळीले
किती जोरात
फटाकडा फोडतंस !...
त्यासना
मनातली भीती
उडीच जात व्हयी !...

## तानात स्थान मिळत नही

येखलंपन सोसाना तान
जीना चढाना...
पायखाल खडा येवाना तान
पाय निसटाना...
आठवनीस्ना तान
काळ भरी काढाना...
तोल सावराना तान
स्थान गाठाना...
- तानात स्थान मिळत नही...

## भिजी तरी जातु...

येळ येस
काळ येस
पन आपुले
बिलगता येत नही !
वारा येस
निळं आभाळ कुठेतरी
दूर फेकी देस...
तेच आभाळ
दूर देशात
पानकळा खेळत बसस...
तधळ कुठे आपु आठे
ऊनात तळमळत
पस्तावत बसतंस...
पावसात
भिजी तरी जातु, म्हनत !...

## येवढं हरितवीर्य

पाऊसना तुटक थेंब
तुटता तुटत नही...
झाडस्ना ताठपना
वाकता वाकत नही
-येव्हढं हरितवीर्य
कुठून येत व्हयी
या सृष्टीमा...

## मी धरी ठेवत नही...

मी सगळ्या
वाची टाकंस कविता
तुन्या मन्या
त्यान्या तिन्या..
सृष्टीन्या
निसर्गना नियमन्या...
आनि उडायी देस
सगळा जगना तोंडवर !...
-मी धरी ठेवत नही...

## वारा कोनलेच दिसत नही !

वारा कुठूनबी
काहीबी उडायी लयस
कागद.. मेनकापड...
कोनाबी घरातलं पुंजं...
आनि
कळीना नारदनागत
दोन घरस्मा
भानगड लायी देस...
वारा कोनलेच
दिसत नही !...
परमेशरसारखा !...

## जाग येस्तव...

मी इचार करी करी
थकी गऊ
आनि तशाच
गाढ झोपी गऊ...
-जाग येस्तव
आभाळ निखरी गयथं...

## मानोस कोनी पाळत नही...

आता कुत्रं पाळानी
संस्कृती शे...
मानोस कोनी पाळत नही...
कोनीच
कोनावर
भाळत नही...

## किती सावली लागंस...

यकला दुकला
मानोसले
आशी
किती सावली लागंस !
यवढा यवढा
जगमा...

## रूतनाच नव्हता नद्यात...

घोडा
आशाकशा
बेफाम सुटना धावत
खिंकाळत
उतावळा
आनि आशा
कोसळना खोल कनी
जशाकाही
कैन्हच रूतना नव्हता
नद्यात
आशा ढोल !...

## तळं ई आरसासारखं...

वाळूशिवाय वाट नही
उन्हातान्हात खडी रखड
खडीनंतर वलांड दरड
पुढे आडवा डोंगर चढ
घसर.. निसट उठी बस
मुरगळायेल आवर पाय..
मुळ्या फांद्या आंगळत चाल
हात पाय पडी गयात
मंग जरासा सरपट पुढे
थोडी थंड झुळूक ई
पानकळाना वास ई
आते जर थांबनास ना-
रडत बिडत बसनात ना-
उदयीन्या पडन्यातच उड्या !
पोटवरली कातडी सोलत
हसत हसत सरपटत चाल
तळं ई आरसासारखं
उलटा झाडं पहात नाच !...

## आपू ऊठनू नहीत ना...

आपू ऊठनू नहीत ना
ते इठे काहीच पिकनार नही
हाई जागा दुखयी..
बुरा कुजयी
वासलेबी सुटयी वास...
आपू उठनू नहीत ना
इठे
कोनीच बसनार नही !...

## पानी व्हयी येताच न्हिंगनू...

जास्त दाबना पट्टाकडून
कमी दाबना पट्टाकडे
आभाळ सरकता सरकता
खूप पाऊस पडी जास...
पानीनी येळ व्हयी येताच न्हिंगनू
तरीबी घर गाठता-गाठता
मी खूप दमी जास-वल्लागच्च..

## बळी

प्रत्येक राम राम ना
मोबदलामा
आपू लोटांगन घालत
बळी जात ऱ्हातंस
बळी जानारा कोंबडानाबी
खंडोबासंगे काय संबंध ऱ्हास !

## चोथा

ऊन नैसर्गिक समजीसन
आपू उन्हाळाबद्दल बोलतंस...
तिकडे ऊन गुपचूप
शोशी घेस पानी आनि
रंगतबी !
आपू तेवढापुरती सावली
पाहीसन
मुकाट चोथा व्हयी ऱ्हातंस !

## वारा सोडी देतंस म्हनून...

उगनारा रोजना याळ
कोयडाच जास
पाऊसपानीबिगर
आनि आपू सरा दोश
झाडंस्ले देत ऱ्हातंस...
वारा सोडी देतंस
म्हनून
बोभाट !...

## आबूट फक्त सावलीपुरतं...

आबूट फक्त
सावली देस झाडस्ले
तीस भागाडाले
त्यास्नाजवळ
पानीच कुठे शे
खोल !...

## नागडा पाऊसनी फूस...

आबूट सूर्यनं दर्शन
व्हऊ देत नही
आनि पडूबी देत नही
पानी...
आबूट फक्त
सूर्य आनि आपलामा
अडतेगिरी करत
नागडा पाऊसनी
फूस लावस...
रोज...

## बाकीना सगळा अवयव...

...दिसाले यकदम सुंदर...
बाकीना सगळा अवयव
सारखाच ऱ्हातंस म्हना...

## आदिम तालनं संगीत...

पाऊसना आवाज सुरू जया
का मी बंद करी देस
टीवी रेडू आनि
घरातला सगळा
बारका बारका आवाज
आनि आयकत बसस
आदिम तालनं संगीत...
जधळ मानसं
बंद करी घेतंस
खिडक्या कवाडं
आनि पंघरी बसतंस रग
ऊब घेत...
आपलीच आपुले
आपला आपला घरात...

## जठे गळू नही तठेच...

झाडं आल्हाद उपटी
फेकी देस आशा
वावधनलेबी
आतडतं नहीत
ह्या काळाकुट्ट ढग...
आनि वावधननी
नेमकी विरूद्ध दिशा पकडीसन
हुबा ऱ्हातंस
पाय रोयीसन
आनि आशा गळतंस कनी...
जठे गळू नही तठेच...

## ढगस्ले पायबी कुठे ऱ्हातंस...

ढगस्ले हात नहीत...
आनि ढग
कपडाबी घालतं नहीत...
वारा वहास
तिकडे वहात जातंस...
आनि थंड हवा लागनी का
गळता गळता
गाळी बसतंस !..
ढगस्ले पायबी
कुठे ऱ्हातंस !...

## आता कुठे फेकू ?

रूतू येस आनि जास,
हे अगडबंब शरीर
आता कुठे फेकू ?

## उबदार ढग म्हनस...

मी मन्हा  
उबदार ढगात ऱ्हास कायम...  
मन्हा गरम सूर्य पंघरीसन,  
कोन्ही घर बांधस...  
कोन्ही बंगला...  
कोन्ही महाल...  
-मी मन्ही कविताले  
उबदार ढग म्हनस !...

## आभाळना रंग...

झाडस्वर कावळा  
डोंगरस्वर बगळा  
तरी आभाळना रंग  
निळाच निळा...

## वरलावर साचत...

त्याच त्याच माटीमा
रोज रोज कोसळंस
तोच तोच पाऊस...
काही भिजत नही
काही उगत नही
काही वहात नही...
त्याच त्याच पानीसाई
वरलावर साचत...

## पान्हा

कुशीत साजन आनि
रडे पाळनामा कान्हा
कशा आवरू बाई आता
मन्हा ठसठसे पान्हा...

## ठोस व्हयीच जास...

डोळास्ले दूरथीनच
चाहूल लागी जास...
कुठे यककडून
कुठे दोन्हीकडून...
तरी डोळा लायी
भर पेठात
यखादी ठोस
व्हयीच जास...

## त्याच पुढे ऱ्हातंस

संसद मधला सगळा खासदार
भ्रष्टाचारबद्दल बोलतंस
आनि ज्या पाव्हा त्या हवालात
त्याच पुढे ऱ्हातंस...

## आपलं आंडं फुटी जायी !

झोपडीमा कोंबडी आंडं दी
चव खानारले कळयी...
कोंबडी दाना-गोटा खायीसन
पंखात पिसवा उबाडयी...
वावधन पांजडं उचकाडयी
सैडनबी कशे बशी ऱ्हायी ?
वमन.. वामन म्हनता म्हनता
वांती व्हयी जाई !...
झोपडी कुठे ?
कोंबडी कुठे ?
वांती कुठे ?
-पृथ्वी सोडता सोडता
आपलं आंडं फुटी जायी !

## कोनताबी चुत्या...

हाड्या फाटीवर
बसानी घाई
आनि फाटी
मुडानी घाई
यकच जयी का
कोनताबी चुत्या
साधू व्हयी जास...
आनि कोनताबी संत
चुत्या व्हयी जास...

## यानं नाव प्रेम

पहिला दिवस वळक
दुसरा दिवस खत
तिसरा दिवस द्वेश
यानं नाव प्रेम...

## बोट दखाडाइतलीबी...

माले राजकारनातलं
क्रिकेट समजत नही
आनि क्रिकेटमधलं
राजकारनबी...
पोटपानीनी नोकरीमाच
मी खूप दमी जास...
कोनाकडे
बोट दखाडाइतलीबी
मनामा
ताकदच नही ऱ्हात !...

## सहन व्हत नही !

मोठं व्हता येत नही
धाकटं ऱ्हाता येत नही
देवनंबी देवपन
माले सहन व्हत नही !...

## आशे म्हनालेबी

मन्हाच शब्दवर
सगळा नाचतंस
आशे कोनी
समजू नही !
मन्हीबी दिशा
चुकेल व्हयी
आशे म्हनालेबी
वाव शे !...

## पाऊस पडी गया का...

पाऊस पडी गया का
आभाळ
निखरी जास...
जंगल मात्र
धुमशीच न्हास
वाफ
मझार दवडी जास...

## इतला स्थावर

कोसळनारा
घर खालच
आमी
झोपमझारच
चेंदाईसन
मरी जातंस
पन
सोडता येत नही
टेकू लायेल
घर
इतला आमी
स्थावर !...

## दोन्हीबी घटनास्ना...

आपली गाडी
कोनी गाडीवर
जाईसन
आदळनी काय,
आनि कोनी गाडी
आपली गाडीवर
ईसन
आदळायनी काय,
दोन्हीबी घटनास्ना
आपू
'ठोस' हाऊ शब्द
वापरीसनच
बोळवन
करतंस...

## कोनीतरी लक्ष ठेवस...

आपू
आपला घरात
कामात गर्क
आनि कोनीतरी
कायम
लक्ष ठेवस
आपलावर
काबरं.. कसाले..
काम्हुन...
आपुले
सांगता येत नही...
पन
सारकं
वाटी ऱ्हास...

## मानोसना तोंडवर बांधेल सोंग...

देवले चालता येत नही
बोलता येत नही
पहाता येत नही
देव हगत नही
मुतत नही
थुकत नही...
देव कोनं भलं करत नही
कोनं बुरं करत नही
देव कोनं पाप-पुन्य मोजनारा
मापारी नही...

देव रंगेल शे
मानोसना मनमा...
तोंडमा
पान रंगस तशा...
देव नुस्ता नाचंस
धर्मना भोवाडामा...
मानोसना तोंडवर
बांधेल
सोंगनागत
धुमडं वाजयी
तशा...
मानोसनाच
पायस्वरी...

## मन्हाच आरसा...

जगातला
सगळा मोठा मोठा
मानसं
माले आदर्श वाटतंस...
आनि तरीबी
सगळाच
वाईट लोकस्मा
माले
मन्हाच आरसा
दखास !...

## आपू कुठे आयकतंस...

आपू
दुसरास्ना बद्दल
वाईटच
मस बोलतंस...
दुसरा
आपलाबद्दल
काय बोलतंस !
ते आपू कुठे
आयकतंस !...

## आपू किस काढत...

आठे
बडबडनारले
बराच मान मिळंस...
आनि मतंबी
मिळी ऱ्हातंस...
आपू फक्त
किस
काढत ऱ्हातंस...
आनि
टीवीमझारनी
संसदमा
आपू
घरातलाघरात
घुशी बसतंस...
यकतर्फी...

## कोनतीच वळ

कोनताच
पुस्तकातली
कोनतीच वळ..
शब्द.. उपमा.. प्रतिमा
माले
हालायी सोडत नही आता...
मी जगेल
जीवन
लिव्हाले
मन्हाच पेन
हातात घेवाले
मन्हीच
हिंमत व्हत नही..
आता...

## देवळस्ना बजार

रूतू
कोनताबी ऱ्हाव...
महिना...
नहीते वार
कोनताबी ऱ्हाव...
आर्थिक मंदी ऱ्हाव
टाळेबंदी ऱ्हाव
नहीते
आख्खा देश
शोककळामा
बुडी जाव...
पन
देवळस्ना बजार
कैनबी
जोरातंच ऱ्हास...

## कोनताबी मानोस सापइतला...

कोनताबी
साप
मानोसइतला
आडवा तिडवा
सरपटत नही...
कोनताबी
साप
मानोस्नागत
डूख
धरत नही...
कोनताबी
मानोस
सापइतला
थंडा
रंगतना नही...

## हिशेब ठिऊ नही...

हिशेब
ठिऊ नही
लोकस्ना...
जशा आपू
मोजतं नहीत
आजपावत
कितला
चाई गयात
डास !...

## कवितानी वहीवर

कवितानी वहीवर
यक फुलपाखरू ई बसनं
आनि पंखच इसरी गयं
कवितानं नावनागत...

## शिक्षा व्हवानी येळपावत...

कोनताबी गुन्हेगार
जामीनवर सुटना का
लोकशाही फुलंसना
हार घी सुटंस !...
आनि कॅमेराबी
सुटतंस त्यानंमांगे
चकाचक...
आरोपीनी
जशे काही
नोबेलच मिळायं...
-कायदातून निसटीसन
शिक्षा
व्हवानी येळपावत
गुन्हेगारनं आयुष्य
आरामात
निंघी जास...

## पाच पिढीस्नानंतर

पाच पिढीस्ना आगोदर
मन्हा पूर्वज
कशा व्हतात...
त्यास्ले
कसाना शोक व्हता...
त्या काय करेत...
माले माहीत नही...
पाच पिढीस्नानंतर
मी कशा व्हतू...
मन्ह चारित्र्य कशे व्हतं...
मी काय काय करू...
कोनले सांगता ई...
आनि मन्ही कोन
निंदा करयी !...

## सर्कस करनी पडंस...

आपला
आजुबाजूना..
शेजारपाजारना
लोकं कायम
कमी-जास्त
उंचीना ऱ्हातंस...
म्हनून
चालानंयेळे
आपुले
डोंबारीस्नागत
सर्कसच
करनी पडंस
भर
रस्तावर...

## धातू युगमा जाई का!

तिसरीना
पुस्तकातला
अश्मयुगमधला
मानोस
चौथीना पुस्तकात
यकदम
धातूयुगमा
जाई का !

## तरीबी जग...

दारं खिडक्या
कितीबी
बंद कयात
तरीबी जग
टीवीमझारतून
घरातंच
घुशी
बसस !...

## आशे रंग उधळंस !...

आभाळातला
थेंब
भुईमा जीरत नही
तवढातच
इंद्रधनुष्य
आडवं येस...
आभाळ
दोनच बोटं
उरनं
आशेच त्याले वाटंस...
आनि आशे रंग
उधळंस कनी
जशे हुल्लेलच !...

## कोनतीच चाल...

देशप्रेमनी
कोनतीच
चाल...
कोनतंच गानं...
आनि देशप्रेमनी
कोनतीबी गोष्ट
आता माले
हालाई
सोडत नही...
दिल्लीले
पाही-वाचीसनच
आता मी
हुबा हाली जास !...

## तुन्हा मन्हा जुगुमना...

तुले मानवाना प्रयत्नमा
मी हार खाई ऱ्हास
तुनी गोष्टना उगू टोकले
मी मालेच दवडी बसस...

मी माले किती येळे कया
मन्हाच रंगतवरी
थापन देवाना प्रयत्न
आनि मोरला उत्सव
येवानं आगोदरच
मी व्हयी बसस घुमऱ्या
तुनी वाढेल- आखडायेल
कपारनी गौळ नादमा...

मी घांगळी वाजी पाही
पावरी वाजी पाही
टापरा वाजी पाह्या
चिमटा हालायी पाह्या

तुनी थाळीना नाद
आझूनबी आयकू येत नही
मी रातभर घुमी ऱ्हास...

मी तुना
भुज्या खाई पाह्या
कोंडी खाई पाही
चौकपूजा करी पाही
तुन्हापुढे
थोम गाडी बसनू
तुन्हा आचरक व्हईसन...
आंगमा वारं घिसन...
तुन्या गावरानखळीमा
खेळत बसनू...
कमारी कोठारीन
मन्हा सुपडामा
येत नही...

पुनी उलटीसनबी
तुनी कपार आझून
वाढत कशी नही...
आपला जुगुम व्हत नही...

-मी तुन्हा घुमऱ्या
आनि तू मन्ही गौळ
तुन्हा मन्हा जुगुमना
म्हसोबा
कैन्ह करई स्वीकार !

## आस्थी

नेहरूऱ्या आस्थी काय,
साईबाबाऱ्या आस्थी काय,
आनि मऱ्या आस्थी काय,
काय फरक पडंस
हात जोडनारा लोकस्ले ?
सगळ्या आस्थी सारख्याच
पंचमहाभूतस्मझारून
कोळसायेल...
तुमना आदरनीय
कैलासवाशी अमूकना
आस्थिकलशमझार
चुकीसन मऱ्या
आस्थी पडऱ्यात ना
तरीबी तुमी
हात जोडीसन
नमस्कार करशात
इतला आपू
सगळाच पार्थिव...

## आपली संस्कृती कोनती शे...

इठे यकले दुःखं जये का
दहास्ले आनंद व्हस...
संधी मिळताच
वाहता पानीमा
आपू हात धुई घेतंस
ते मंग
आपली संस्कृती कोनती शे !...

कोनले अपघात जया
कोनले लागोपाठ पोरीच जयात
कोना ऊस जळी गया
कोनी आजारी पडनं
कोनी पाय घसरी पडनं
कोना पाय मुरगळायना
कोनाकडे भानगडी जयात
का मंग आपुले
मनातलामनात
आनंद काबरं व्हस !

कोना व्यंगवर
बोट ठेवाले
कोन्या
कुचाळक्या कराले
कोनावर

शितडा उडावाले
आनि परकी
बाईकडे पाहिसन
आपली वासना
उठी बसस
ते मंग
आपली संस्कृती
कोनती शे !...

## आपून आपला ऱ्हातं नहीत...

पाट खाजाले
हात पुरत नही...
पुरस तठे
भर गर्दीमा
खाजता येत नही...
खाज
जिरावता जिरावता
आपून आपला
ऱ्हातं नहीत...

## दोन दिवसनंतर...

आत्माले गहान टाकीसन
मी चढी वनू इठ्पावत
दम टाकत...
श्रेय उपटाले
जो तो खाल हुबाच शे...
'मी उतरनार नही' ना
भरोसावर
मन्हापावत आदळात वन्यात
त्यासन्या आरोळ्या :
''आमनामुळेच.. आमनामुळेच..''
आनि मी बी त्यास्ले
आभारना हात हालाईसन
आखो सरकनू वर
..पाय 'नही नही' म्हनतंस...
त्यास्ना हात हालायेल
आता थोडा थोडा दिसतंस
दोन दिवसनंतर
त्याबी व्हतीन डोळाआड...

## शरन जावासाई...

मी दोन पायस्वर
हुबा राहू शकत नही नीट...
डगमगत...
बोलता बोलताबी
शब्दस्नाबरोबरच
महत्वना येळेच
शरीरनाबी तोल जास...
नेमका त्याच येळे
मन्हा आत्मईश्वासबी
गळी जास...
आनि साक्षात
निसटंस पाय
विकलांग...
मी काहीच
करू शकत नही...
कोनी सहानुभूतीले
शरन जावासाई...

## डंख याहेल आभाळ...

कोरा कागदनागत
करकरीत आभाळ
आनि हिरवा
पानससाई
यकबी फूल
नशेल
विरक्त झाड...
बाकीनं सगळं
मेंढ्या आबूटनागत
डंख याहेल
आभाळ
पानीसाई
दमानंगत...

## रस्ता मौनीबाबा जया...

तुन्हा भारेल
रस्ताथीन
जावानं येळेस
मन्हा कवचकुंडलं
गळी पडतं नहीत आता
पहिलासारखा
रस्ताले लागत नही आता
मौन पाळानी आग.
रस्ताच मौनीबाबा जया...
पराभवनी
जबाबदारी
जशी काही आता
त्यानीच घी घीदी...

## पदन्यासना वाक

उगू नही
आशा जागेच
नेमकं
उगंस झाड
(आनि लागवडनं
महत्व कळीसनबी
पसरस
प्रदूशननी आग)
मग इष्ट
यकाक्षबी
वळखना पडतंस
फक्त पाहीसन
पदन्यासना वाक...

## सावल्या

ढगस्न्या
घनदाट सावल्या
सरकती नहीत
वावधनातबी...
ढगस्ना
गडगडाटलेबी
घाबरती नहीत...
सावल्या
फक्त थरथरतीस
आनि वरून
भयान कोसळस
मुसळधार
पाऊस...

## प्रतीक म्हनीसनच...

सैतानले
दगडी मारानं येळे
मानसं मरतंस
आनि देवले
भजानंयेळेबी
मानसंच मरतंस...
मंग
देव आनि दानव
फक्त
प्रतीक म्हनीसनच
उरतंस...

## पाऊस ईच आशे...

आभाळ भरी वनं
आनि जमीनबी
व्हई वनी
तरी पाऊस
ईच, आशे नही !...

## यकलंपन

आपलं
यकलंपन
कोनीच
वाटी
घेत नही...
बायकोसुद्धा नही...
मंग
बाकीनास्नी
गोष्टच सोडा !...

## हयातीमा कितीतरी

कितीबी
मारात डासं
तरीबी उरतंसच
हयातीमा
कितीतरी !...

## चौथा रूतू नही

पानकळामा
माले चिखोलमुळे
चालता येत नही...
हिवाळामा
माले हिवमुळे
बोलता येत नही...
उन्हाळामा
माले ऊनमुळे
खाता येत नही...
आनि ह्या
तिन्ही रूतूससाई
चौथा रूतूच नही
आयुक्षमा !

## जीवन कोनताच सुविचारमा...

कोनताबी
घरनी
कितलीबी कयी
शांती
तरी मानसस्ना
भुतं
नाचासाई
न्हातं नहीत...
-जीवन
कोनताच
सुविचारमा
माहात नही !

## तव्हळ कुठे बडोदाले...

लहानपननी
जगेल... भाशा
मी खंदी काढी खोल
तव्हळ कुठे बडोदाले
आत्तेशी वाजना ढोल !

## येळवर मिळत नही !

राहू गया.. केतू गया
माले शनीनीबी सोडी दिधं...
मन्ह नशीब अजून कशे
फळफळत नही...
महिनाभर आगोदर
टाकेल पत्रबी
येळवर मिळत नही !
कोनताच आमंत्रनले
'ओ' दिसन
माले
हाजर ऱ्हाता येत नही !...

## पेलू शकत नही

सृष्टीले
भरती वनी का
सूर्यबी पुरत नही...
यवढी यवढी
रातबी
सृष्टी
पेलू शकत नही...

## चिखोलफेकनागत

मन्या पोरी चढी चालन्यात
पहिली...दुसरी... तिसरीना
पटापट साटा... वर... वर...
आनि मन्ही पंध्रा वरीसपशी
इयत्ता यकच.
यक कवितासंग्रह
प्रकाशनना वाटवर !
-परत्येक संमारंभमजारली
मन्ही वळख
माले चिखोलफेकनागतच
सहन करनी पडंस !...

## दुस्काळ कशा म्हंता ई ?

बारा महिनाना
तीनशे पासट दिवस
बायास्ले
दिवसच जात न्हातंस
ते दुस्काळ
कशा म्हंता ई ?

## ढगस्ना कितला कळपं

पाऊस वना नही का मंग
समदा मूडच जास...
आता ई
मंग आतातरी ई
आशे म्हन्ता म्हन्ता
ढगस्ना कितलाबी कळपं
सहज न्हिंगी जातंस
वऱ्हातून हेटे
राजरोस...
वारा मूंग गिळी बसस तरीबी...
वर डांग लागी बसस
तरी इकडे ऊन-सावलीना
खेळ सुरूच ऱ्हास रातदिवस...
आशे करत महिना न्हिंगी जास...
कोनी उन्हात
इस्तो टाकेलनागत
पाऊस हुलकावऱ्या दी ऱ्हास..

## दारवर जाई ऱ्हावा...

नटी थटी रडनाऱ्या
टीव्हीमधल्या
बाईस्नागत
आठे खूप लोकं
दुःखी शेतंस...
-आपू
दारवर जाई ऱ्हावा...

## सामोरा जाई ऱ्हास...

कोनले स्तुतीनी
लाच दीसन
माले
वसूल करता येत नही
चांगुलपना,
रोज
नवीच लढाईले
मी सामोरा
जाई ऱ्हास !...

## मोरी सोडी दिधी...

धरन भरी वनं का
नदीना वढाखाल
हैरान...
मंग नदी
कितीबी ऱ्हाव
वैरान...
आनि यकदाव
तळमोरी सोडी दिधी का
मंग कुवारी नदी
कितीबी ऱ्हाव
कुर्बान...
तरी नको !...

## सज्जनच ऱ्हावा

खिडकीनाभायेर
शेजारनास्नी
फेकेल गूघानमा
चरनारा डुकरस्ले
हरनं...
त्यास्ना खंडीभर
पिल्लासले ससा...
आनि त्यास्नी
डुरडुरले
गाय-वासरूनं
हंबरनं
समजीसन
आपू सज्जनच ऱ्हावा...
आनि कविता-बिविता करी
नामानिराळं ऱ्हावा
संतस्नागत
स्थितप्रज्ञ...

## देव आजूनबी वेठबिगार

पानकळामाबी
पाऊस पडना नही का
मंग आमना पूर्वज
आमना गावना मारोती
शेनवरी लिपी दियेत
आनि पाऊस वना का
शेंदूर-आंघुळ घालीसन
आखो देव म्हनी
पूजा करेत
भक्तीभावखाल...
-बिचारा मारोतीनागत
गंजच देवं
गावोगाव आजबी
वेठबिगार शेतंस...

## खोल गाळात फशीसन

आशा नेमकाच
पाऊस पडस
पडनारा
प्रत्येक थेम
माटीमाच जिरस
खोल...
पडनारा थेम
दूर
वाही जात नही...
म्हनून
हाऊ काळोख... वास...
हाई चिगचिग...
भयानच खावाले
उठस तरीबी
आपू उरतंसस तोळामासा
पाय खोल
गाळात फशीसन...

## आल्हाद सोडी देस

रात जई का
त्यानी जांघमा
सूर्य उगंस
आनि आथरूनमा
पानकळा...
-दिनभरना
समदा उन्हाळा
रातना पावसात
तो आल्हाद
सोडी देस !...

## चेहेरा झाकी टाकू...

स्त्रीना
कितीबी ऱ्हाव
कुरूप देह
माले चोळाले
आवडस...
चेहेरा झाकी टाकू...

## फसवा पाऊस

फसवा पाऊस
आते
लागीच बसई
आशा
काळोख करी देस...
आक्राळ
सुरवात करीसन...
लगेच
गुळनी सोडी देस
नागा व्हईसन...
लेकरूनागत
पाऊस
वासनानी मान टाकी
झोपी जास !...

## सूर्य फुलता फुलत नही...

पाऊसनामांघेच
येस पाऊस...
हाऊस
फिटता फिटत नही...
हिरवागार
वांझ गवतना
यकबी टोकले
सूर्य
फुलता फुलत नही...

## देवलेबी यक सत्यनारायन...

लाच घी-दी
काम करी घेनारा लोकं
श्रावन महिनामा देवलेबी
यक सत्यनारायन
घाली देतंस...
आनि आपलाआपला कामले
आखो मोकळा व्हई जातंस...
वरीसभर !...

## हाऊच ते नडस मानोसले...

काही काही येळा गाडीमाच
स्वर्ग दखास
मंग खिडकीमझारला
निसर्गसाई
आपू स्वर्गमाच
रमी जातंस...
स्वर्ग धुंडाळना पडस
स्वर्ग पान्हा पडस
स्वर्ग संमोहित करस
स्वर्ग आंगात येस
स्वर्गमा मुक्त व्हता येत नही
स्वर्गले हात लावता येत नही
हाऊच ते नडस
मानोसले
निसर्गना उलटा
नियम...

## सुरळीत चालू ऱ्हातंस

आपू सगळा
वेव्हारना इतला बनेल ऱ्हातंस,
गावमा कितीबी
मुद्दाना प्रश्नवर
परिसंवाद चालू ऱ्हायना
तरीबी दारूदुकानपशीन
ते बिल्डिंग-मटेरियल्सपावतना
सगळा वेव्हार
सुरळीत चालू ऱ्हातंस...

## काटा खुपशी जास...

मधमाखी चावनी ते
ती आपला रंगतमा
मध नही सोडी जात,
काटाच खुपशी जास...
खोल...

## जुलैपशी जुलैपावत

कोनीच नवथू
तव्हळपशी
काहीतरी शे
वाटापावत
मजल मारी
बडोदाले...
तरी पुनाले
प्रभंद
ठप्पच पडी ऱ्हायना
कपाटात...
जुलैपशी
जुलैपावत...

## न्हिंगी जास रूबाबमा...

ह्या पाऊसले
नागा म्हनू
का नावगा
आशा इचारात
मी बुडी जास
तवढामा
पाऊस
सुटबुटमा
न्हिंगी जास
रूबाबमा !...

## खूप गरज शे

माले आते
सेक्सरेस्टनी
खूपच गरज शे
त्यानंतर बेडरेस्टबी
माले आपोआप
मिळू शकई...

## पोटातला पोटात व्हता तरी

पाऊस पोटातला पोटात गरजंस
आनि अंधारमा
कोनती माटीमा पडी जास
त्यालेबी कळत नही
वाळवंटमझारला ओयॅसिसनागत
ईजा चमकीसन
वास्तव लपाडीसन
गुपित व्हई जातीस
आनि अंधारमा
शोध लागनं दूरच
पन संशोधनबी
आपू करू शकनार नहीत
सकाळीस व्हस तव्हळ
ध्यानात येस,
हाऊ पाऊस नवथाच,
जव्हळ आपू
टहाळबन आयकी ऱ्हायंतूत
पोटातला पोटात व्हता तरी
गरजाना आवाज...

## कविता करनं म्हनजे

संदर्भ ध्यानात
घेवासाई
आपूले कसानाबी
आर्थ लागत नही...
आपू कोन्याबी
'वाची टाकतंस'
कविता
आनि सोडी देतंस
'यकून कविता'
गोळाबेरीज करीसन...
कवितापावत
पोचता येत नही म्हनून
मंग ''कविता करनं, हाऊ
दखलपात्र गुन्हा शे''
आशेबी म्हनंस
यखांदा आसामी समीक्षक
मोठा !...

## पाऊस वाही धुई

हावानी
जेवढा चोळात
ढगं
खिंडमा कोंडीसन
तेवढा सांडालेच पायजे
पाऊस शिवारमा
मोकळाढाकळा
टपोऱ्या गारसहित
वाही धुई...

## किरकोडास्नी वळवळनागत

किरकोडास्नी
वळवळनागत
परत्येक गावनी
वर्दळ दखास
गाडीनी
धावती खिडकीमझारथून...

## आनि आदिवासीस्ना झ्यापस्मा

आते आदिवासीस्न्या
भितीस्वरबी
पिठोरास्ना चित्रस्ना जागे
पेप्सी-कोलान्या जाहिराती
दखावाले लागन्यात...
टीव्ही... रेडू... पोलीस...
ह्या ते पिठोरास्नी
मिरवनूकमाच
आते सामील व्हयेल दखातंस...
आनि आदिवासीस्ना
झ्यापस्मा
इसवी सन पंधराशेमधलाच
चुल्हा मांडेल शेत आजून...
ज्या येळवर
पेटतंसच
आशे नही...

## बडोदाले परत्येकनीच गृहीत धरं...

पिंपळनेरले पंचरकर्ता तीन तास
तरीबी बापूजीनी बार्डोलीले
बस बदलनीच पडनी...
मन्हा शेजारलानी जिले
दिधी व्हती बैलगाडीनी उपमा...
सुरत आखो लुटाइतली
गचागच भरेल दखायनी
पुढे ज्यानी नर्बदाले
दोन्ही हात जोडीसन नमस्कार कया
त्यानी माले नवापूरले मानोसकी दखाडी नवथी
तवपावत वाटवर मसच गाड्या
कानी... ठोकी... कंडी... उलट्या व्हयेल दखाय्न्यात
आनि पाऊसनी
विज्ञाननी पर्वा कैनच कई नवथी...
यक ढाबावर जेवन कयं... यक ढाबावर चहा पिधा...
चार तास लेट गऊ तरीबी
मी पोचनू सेमिनारना बारा तास आदूगर
कोनले सांगानी येळच वनी नही
बडोदाले परत्येकनीच गृहीत धरं...
मी आदिवासी !...

## कानकुन लागनी नहीच

घरात लायेल फोटोस्वरथीनबी
लोकं आता जाती
वळखाले लागात...
कोनी कोनी
आडनाववरथीनच
वळखी घेतंस...
आनि ह्या दोन्हीस्वरथीनबी
कारकुन लागनी नहीच
ते काही लोकं
डायरेक इचारीच घेतंस...
'तुम्ही कोन ?'

## गाळात पाय सरकू नही म्हनीसन

पाऊस पडना का
मन्हा आजूबाजूनी काळी माय
प्रसरन पावत लोनीनागत चिघळी जास
पायात चप्पल घालू देत नही...
माटीनीच चप्पल व्हस तयार
पायखाल जडबदक
ते चप्पलनं काय काम...
आभाळातून ऊनना किरन दिसना का
मन्हा मनना मोर
थुई थुई नाचाले लागस...
आते जावाले रस्ता
ठनठनात व्हई जाई म्हनून...
सूर्य कव्हळ झाकाई जास
आनि आखो कोनताबी आदेश
नही म्हनून सहज आळसायेल
पाऊस कव्हळ सुरु व्हस
कळाना आदूगारच
वळात इयेल चिखोल
गाळ व्हई जास
आनि आजबी मंग मी घरच बसस
गाळात पाय
सरकू नही म्हनीसन...

## आनि चिखोल ते आठे

हाऊ चिखोल जखडी ठेवस माले
जशी माटी झाडले जखडी ठेवस
माले प्रसिद्धी मिळानी प्रगती करता येत नही
आनि मना मांघे नेमका किजवा चमकाई जातंस
मन्हाजवळना कंदील
धूर सोडी खलास व्हई जास
रोज रोज जळई किती !...
आता ते काच इतला काळा जया
हात लाईसन जाळी घेवासाई
कंदील जळी ऱ्हायना
हाई शप्पत घीसन
कोनी कबूलच करनार नही...
आनि चिखोल ते आठे
सर्वश्रेष्ठ शे !

## तुमन्या करनीस्मा

स्वर्गनी
गॅलरीमा बशेल
देवस्व
आनि नरकनी
गच्चीवर बशेल
दैत्यस्व
यकमेकस्नी जागा
बदली पाहा
कवीनी हातचलाखीसाई
तुमन्या करनीस्मा
काहीच फरक दिसत नही.

## घर पोचनूत का मंग

परत्येक झनले वाटंस
खूप पाऊस
येवाले पाहिजे
आपू
घर पोचनूत का,
मंग...

## चिखोल वळावानी प्रार्थना...

तिनी पाटवरली
हिरवळमुळेच
मन्हा आभाळात
दाटी इयेल ढगं...
पडदा हुगाडाना आदूगारच
पाऊस
विंगमाच पडी जास
अवकाशनी कोनतीच
जोखीम
न स्वीकारताच...!
नंतर निस्ती
चिखोल वळावानी
प्रार्थना
करी ऱ्हावा...

## आक्खा बागायतलेच

तिना पाऊस
जगाडानी काकोळीतमा
मीच पावसाळा
व्हई जास साक्षात...
आनि ती कोरडवाहू
वावरनागत
आक्खा बागायतलेच
येडामा काढस...

## आपलं काम नही...

आपू आपूलेच
मोठं समजीसनी
गुपचूप बसू
जागावरच...
चळवळ-बिळवळमा
भाग घेनं
आपलं काम नही...

## तरूनपननी पायरी लागीच नही

सटानाना
नाशिक नाकाना मांघे ऱ्हाईसन
मी भाऊ पाध्येनी
वासूनाका वाची तव्हळ
लहानपनमा गाजाडी ती
विरगावनी चावडी आठवनी
पन मन्हामझारला
वासूनं तरूनपन
उतूच गयं नही कहीनच
कोनताबी वयात
कोनताबी गावना
नाकावर...
तितला येळच मिळना नही...
आझूनबी इचार कया ते
माले आठवतंच नही,
मी कहीन तरून व्हतू ?
बालपनमझारथून
यकदम प्रौढपननीच
पायरी चढी...
तरूनपननी पायरी
माले वाटवर लागीच नही...

## उपरा गावमा गुपचूप

बडोदाले
दिलीप पुरुषोत्तम चित्रे, यास्ले
चित्रेस्ना वाडा सापडत नही
आनि माले इरगावमधला
नवा पिढीना पाचवीना पोऱ्या
वळखत नही...
गल्ली-गल्ली, घर-घरमझारली
गावनी परगती मना वाटमा
ठेचकाळंस...
जमीनमाथी वर इयेल
दगडस्नागत
आनि मी
रक्तभांबळ व्हईसन
परती येस
स्थायिक व्हयेल
उपरा गावमा
गुपचूप...

## पाऊस पडानी हामी

हेट्या
वाही जानारा ढगस्ले
थांबाडाकर्ता
यक आडवा डोंगर
हुबा करी ठेवाना
मना इचार शे...
म्हनजे वरीसभर
नसना तरी
पानकळाना
चार महिना
का व्हयेतना
पाऊस पडानी
हामी
माले देता ई !

## नैसर्गिक सत्य मान्य करत नही

आंबाना मोहोर
जळी जातंस
बालबच्च्या
कैऱ्याबी गळी पडतीस...
मी पोचू शकत नही
झाडपावत...
झाड मन्हापावत
चालत ई... आशे वाटंस
म्हनून मी वाळूमझार हुबा ऱ्हास
उन्हात करपत...
झाडले पायं ऱ्हातं नहीत
हाई नैसर्गिक सत्य
मी मान्य करत नही
मन्हा अस्तित्वसहित...

## यखांदा चिरा

शेंदूरसाई देव नही
तशेच व्यसनसाई
मानोस नही...
सुपारीना खांडनंबी
व्यसन नही
आशा मानोसना
निदान सबाव तरी
हातात धरता
येनार नही !
जशा
निराकार देवनाबी
कहीनतरी
व्हईच जास
यखांदा चिरा...
श्रद्धानं परतीक
म्हनीसन साकार !...

## घर चिरेबंद ऱ्हास...

घर मातीनं ऱ्हायनं तरीबी
चिरेबंद ऱ्हास...
धक्का बसना
आनि चिरा धसळना...
आशे व्हत नही...
चुकीसन दगड ढळना
तरीबी हादरा बसत नही
आक्खा घरलेच !
- घर चिरेबंद ऱ्हास...
पेटीनागत
किल्लीकुलपात...

## खरं लपाडाले पाहास...

मी दिवाळी साजरी करस,
का सोय म्हनीसन
गर्दी धुंडाळंस !
-मी खरं
लपाडाले पाहास...

## जित्ता कोंबडाना मालकले...

कोंबडास्नी लढाई लाई का
चांगला पाऊस पडस
दोन्हीस्पैकी यक मरापावत...
मरेल कोंबडा व्हस-
जित्ता कोंबडाना
मालकनी मालमत्ता...
चांगला पाऊस
व्हवाकर्ता
वरीसभर कोंबडास्ले
विशिष्ट खाद्य घालीसन
माताडी ठेवतंस...
जित्ता कोंबडाना
मालकले
मरेल कोंबडं
म्हनून
चविष्ट लागत व्हई !

## ऊन पैरीसन आरपार

रूतू नही तरीबी
पाऊस गरजंस
तशेच
गाय नही तरीबी
बैल हंबरस
ठेशेलबी...
आनि आक्खा दिवस
ऊन पैरीसन
आरपार
न्हिंगी जास...
मनमझारतून...

## सपनमा दिवा...

ये,
तू नही माले आवड्त,
पन तुनं वय आवडस !
तू आशीच येत न्हाय
रोज...
सपनमा दिवा !...

## बैलयारी

समाधीवर
शेंदूर लाई घेना व्हई
ते गडा
हाई जुवाडं
धर खांदावर तोलीसन,
धनी येस तवपावत
मी चाटी देस खांदा
कर पुढे...

आता तू माले
आनि मी तुले.
गया तो जमाना
यारीस्न्या जिभल्यास्ना स्पर्शना
नरस्ले खांदा दीसन
आपू आंड ठेशेल हिजडाच शेत आता.

गडा ऊठ, धनी वना
हाई जिनं धर खांदावर तोलीसन
समाधीवर
शेंदूर लाई घेना शे ना ! मंग ऊठ !

## तोच नळा तोच खिळा

तोच नळा तोच खिळा
नळा उलसा ऱ्हाई कशा ?
खिळा मोठा व्हई कशा ?

तीच लाट तीच मोट
रोज रोज तीच गाठ
मोकळी ढाकळी बखळ वाट
चढी चढी तोच घाट...
दमी जास...

## ढगं निस्ती सावली

ढगं
निस्ती सावली देतंस
झाडस्ले,
तृप्ती देवाले
त्यास्नाजवळ
पानीच कुठे शे...
गोड !

## दोश झाडस्लेच दी ऱ्हातंस

उगेल दिवस
कोयडाच जास
पाऊसपानीशिवाय
आनि सरा दोश
आपू झाडस्लेच दी ऱ्हातंस
वारा सोडी देतंस
म्हनून...
बोभाट.

## जाग येवापावत

मी इचार करी करी
दमी गऊ
आनि तशाच
गाड निजी गऊ...
-जाग येवापावत
आभाळ
आक्खं निवळी गयथं !...

## मांघेथीन इयेल परत्येकले

बोटले लागेल
मेचडं पुसाले
देवनी
गल्ल्यातली गायले
हात लाया,
तो मानोसनी पाह्या
मंग देवनी मानोसले बनाडं,
'गायना पोटात आम्ही
सगळा ऱ्हातंस
तेत्तीस कोटी देव !'
मंग मांघेथीन इयेल
परत्येकले
गायमा देव दिसाले लागात !...

## नागडा पाऊसनं आमिश...

ढगं सूर्यनं दर्शन
व्हऊ देतं नहीत
आनि कोसळूबी देतं नहीत
पाऊस...
ढगं निस्ता
सूर्य आनि धरतीमा
दलाली करी
नागडा पाऊसनं
आमिश दखाडतंस
रोज...

## बरोबर नक्की काय ऱ्हास ?

यकदाव
हाई बरोबर वाटंस
यकदाव ते बरोबर वाटंस
मंग बरोबर
नक्की काय ऱ्हास !
-तिसरं... चौथं... पाचवं
का आखो साव्वंच !

## आनि पायजे तव्हळ...

नको तव्हळ
आशा
चढी येस कनी
पानी
सगळीकडथून...
कळस तधळ
बदं बदं वतायेल पानीमा
आपू
वल्लाचिखोल
व्हई जातंस...
आनि पायजे
तव्हळ
पहाय वाट
पहाय वाट...
कितीबी रावन्या कयात
तरीबी सगळं
जमेल आभाळ
कथं निवळी जास
पत्ताबी लागत नही...

## मुळं रोईसन हुबा...

तुनं दार
मनं दार
समोरासमोर
शेतंस तरीबी
मझार
मसच झाडं झुडपं
मुळं रोईसन हुबा ऱ्हातंस
बारमाही
हिरवागार !

## आर्धा साप

माले आर्धा साप दिसना
सपनमा !...
आनि आर्धा वाही गया
पाऊसमा !...
मी धरी ठी व्हती हातमा
ती व्हती-
आर्धीमुर्धी
तुटेल कात !...

## पंडाळ बंद व्हत नही...

कितीबी
गोळ्या घिद्यात
तरी हाऊ
पंडाळ
बंद व्हत नही...
पंडाळ ते पंडाळ
पन काय आटकी जास
मझार तेबी कळत नही...
आपू फक्त शिकरी ऱ्हावा
शिकास्वर शिका दी ऱ्हावा
डोकं आशे
जड व्हई जास
काही सुचूबी देत नही...
इतला सोनासारका शरीरमा
इतला गाळ कथाईन येत व्हई
आपू निस्ता कदरी जातंस
आनि पंडाळ थांबानं नाव घेत नही...
जीव आदमला व्हई ऱ्हास...

## जित्ताले सांगाले ऱ्हात नही...

चापट बशीसन
मरी जानारा डास...
जित्ताले
अनुभव सांगाले
मांघे ऱ्हात नही
म्हनून
भायरथून
नवीन उडी येनारा
सहज आंगवर
बसानी घाई करस
बेरड...
आनि तोबी
माटीमोल व्हई जास !...

## कातमझारला सापले...

सापना तोंडले कितला फोडं
मोजता येतं नहीत !
साप चावस नळाले
का नळा चावस सापले
सांगता येत नही !...
-नळाना तोंडले
इतल्या नांग्या कशाकाय उगतीस...
कातमझारला सापले
इतल्या नांग्या कशाकाय डसतीस...

## आपलाच हात भळभळ

गेंडा
आखो पंघरी बसस
कासवनी पाट...
कितलंबी बोचका... कितलंबी हाना...
आपलाच हात रंगतना
भळभळतंस...
गेंडा कोनलेच दिसत नही !..

## थडी खचत नही...

घरना चवकोनात
मन रमत नही
दारनी फट बुंजाले
मेन मिळत नही
खिडकीना भोकले
डोळा पुरत नही
पायस्मझारला दांडू
आझून टिचत नही
यकच शे कोली
थडी खचत नही !

## उन्हाळा व्हई वनू...

तिन्हा
पावसाळा
जागा कराले गऊ
आनि मीच
उन्हाळा
व्हई वनू...

## गल्लीमा बोंमबी मारता...

झाडस्मा टपेल ऱ्हातंस डासं
खिडक्या बंद व्हवाना आगोदर
आल्लाद उडी येतंस घरमा...
आपलं शोशी ऱ्हातंस रंगत
आंधार-झोपना फायदा घीसन
रातभर
आनि कोयडी व्हई ऱ्हास
आपली कातडी जागेच
-आपुले गल्लीमा
बोमबी मारता येत नही...

## तोडेल नाळ सुईननी

भारत जोडा
तरी
गाव तुटानी
जखम
भरता
भरत नही,
तोडेल नाळ
सुईननी
कथी फेकी
सापडता
सापडत नही !...